राज्य योजना सन २०२२-२३

डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या योजनेतर्गत निधी वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी- ०३.२३/प्र.क्र.९०/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक :- ३१ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक :- डब्ल्यूएलपी-०५१५/प्र.क्र.१५५/फ-१, दिनांक ०४.०८.२०१५.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२.
३. शासन निर्णय,महसुल व वन विभाग, क्रमांक :- डब्ल्यूएलपी-१२२१/प्र.क्र.३४०/फ-१, दिनांक २५.०५.२०२२.
४. महसूल व वन विभाग, शासन पत्र क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०२.२३/प्र.क्र. ५५ /फ-१, दिनांक : १७.०३.२०२३.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १६.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

वनालगतच्या गावांमध्ये तेथील जन-जल-जंगल-जमीन या संसाधनांचा शाश्वत विकास साधून उत्पादकता वाढविणे, गावक-यांची वनावरील निर्भरता कमी करणे, शेतीला पूरक जोडधंदे निर्मिती करणे, पर्यायी रोजगार उपलब्ध करून देणे यातून मानव-वन्यप्राणी संघर्ष कमी करणे व अशा त-हेने गावक-यांच्या सहभागातून वन-वन्यजीवांचे संरक्षण व व्यवस्थापनाचा दर्जा उंचावून गावांचा सर्वांगीण विकास करण्यासाठी राज्यामध्ये डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन-विकास योजना संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये सदर योजनेची व्याप्ती वाढवून सौर ऊर्जा कुंपणाची बाब समाविष्ट करण्यात आली आहे.

त्यानुसार संदर्भ क्रमांक ३ च्या शासन नमूद निकषानुसार सर्व प्रादेशिक व वन्यजीव वृत्तांकडून वनवृत्तनिहाय वन्यप्राण्यांकडून झालेल्या शेतपीक नुकसानीच्या मागील तीन वर्षातील गावनिहाय घटनांच्या संख्येच्या अनुषंगाने शेतपिक नुकसानीच्या दृष्टीने ११७३ गावांपैकी संवेदनशील ४४७ गावांमधील ३१००५ लाभार्थीना सौर ऊर्जा कुंपणाचा लाभ देण्यासाठी तसेच वन्यजीवांपासून शेतपिक नुकसानीची संवेदनशीलता लक्षात घेऊन उर्वरित ७२६ गावांमधील सौर ऊर्जा कुंपणाचा लाभ देण्यासाठी ३७९४६ लाभार्थींना विशेष बाब म्हणून लाभ देण्याच्या अनुषंगाने संदर्भिय दिनांक १६.०३.२०२३ रोजीच्या शासन आदेशान्वये निवड करण्यात आली असून शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक १ चे परिपत्रक विचारात घेता संदर्भ क्रमांक ४ च्या शासन आदेशान्वये निवड करण्यात आलेल्या लाभार्थांकरीता डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या लेखाशिर्षांतर्गत खालील तक्त्यात नमूद केल्याप्रामणे रु. १६२२.६४ लक्ष निधी खालील अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे: (रु. लाखात)

| उदिष्ट शिर्ष | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|
| २१-साहित्य पुरवठा | ८२२.८२ |
| ५०-इतर खर्च | ७९९.८२ |
| **एकूण** | **१६२२.६४** |

i. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०२२-२३ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२, पर्यावरणीय वनिकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संरक्षण, (००) (१८) डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

ii. सदर शासन निर्णयान्वये वितरीत निधी शासन पत्र क्रमांक :- डब्ल्युएलपी-०२.२३/प्र.क्र.५५/फ-१, दिनांक १७.०३.२०२३ सोबतच्या प्रपत्रात नमूद करण्यात बाबींवर खर्च करण्यात यावा.

iii. योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

iv. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

v. सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.

vi. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

vii. संदर्भ क्रमांक १, ३ व ४ च्या शासन निर्णय व आदेशांचे काटेकोर पालन करण्यात योवे.

viii. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १६.०३.२०२३ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९३/१४७५, दिनांक २३.०३.२०२३ व वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक १७१/व्यय-१०, दिनांक २९.०३.२०२३ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४०६१७१९०८१२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.04.06 17:24:52 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपुर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
६. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
७. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.